४) फिरत्या वैदयकिय पथकाचे वाहनांची नोंद आहे का हयाच वाहनांची नोंद फॉर्म B मध्ये (नोंदणीकृत प्रमाणपत्र) असली पाहिजे आणि असे तपासावे कि, उपलब्ध असलेल्या वाहनांची संख्या ही फॉर्म B मध्ये नमूद असावी.

५) सेवा देणारांचा पुर्ण पत्ता

६) फिरत्या वैदयकिय पथकामध्ये PCPNDT कायदयानुसार बंधनकारक असलेल्या सर्व सेवांची उपलब्धता

- *केंद्रांमधील दप्तराचा आढावा -*

I) फॉर्म F ची पडताळणी (अनुवंशशास्त्रीय चिकित्सालय/सोनोग्राफी सेंटर) (परिशिष्ठ ७ मध्ये फॉर्म F दर्शविला आहे.)

a. F फॉर्म वरील सर्व रकाणे भरले आहेत का ? F फॉर्मवर सोनोग्राफी करणा-या डॉक्टराने स्वाक्षरी केली आहे ? नाव, शिक्का व कायदयानुसार क्रमांक लिहीले आहे का ?

b. प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेच्या आधि गरोदर महिलेची संपूर्ण माहिती असलेला संपूर्ण फॉर्म एका प्रतित समुचित प्राधिकारी यांचकडे पाठवावा.

c. जेव्हा non-invasive (जसे की सोनोग्राफी )तंत्राचा वापर केलेला असेल तेव्हा गरोदर महिलेचे घोषणापत्र तिला अवगत असलेल्या भाषेमध्ये घेतलेले असले पाहिजे.

d. Invasive Procedure जसे उदरपोकळीच्या पुढील भागातून सुई व सिरिंज यांच्या सहाय्याने गर्भजल काढणे वापरले असेल तर तिला अवगत असलेल्या भाषेमध्ये गर्भवती महिलेचे संमतीपत्र घेतलेले आहे किंवा कसे याची खात्री करावी.

e. डॉक्टरांनी घोषणापत्रावर वेळ आणि दिनांक लिहिणे बंधनकारक आहे.

f. रेफरल नोंद आणि सोनोग्राफीची फिल्म यांची नोंद अदययावत ठेवली पाहीजे.

g. वाहयरुग्ण नोंदवही, गरोदर माता नोंदवही रोकड जमा पावती.

h. संगणकातील नोंदी आणि मुळ प्रतीची पडताळणी करणे.

केंद्रीय पर्यवेक्षकीय बोर्डची सभा १७ ऑक्टोबर २००५ रोजी आयोजित करण्यात आली होती. त्यांच्या शिफारशीमूळे F फॉर्म ऑनलाईन भरण्याची यंत्रणा विकसित करावी असे सुचविले. सदर ऑनलाईन यंत्रणेनंतर काही राज्यसरकार यांनी ऑनलाईन F फॉर्म भरणे बंधनकारक केले. अशा प्रकरणामध्ये ऑनलाईन F फॉर्मच्या प्रती सोबत मुळप्रतितील फ फॉर्म तसेच डॉक्टरांचे संमतीपत्र, गरोदर महिलेचे संमतीपत्र (घोषणापत्र) ठेवणे आवश्यक आहे.

II) फॉर्म D ची पडताळणी (अनुवंशशास्त्रीय समुपदेशन केंद्र) (परिशिष्ठ ८ मध्ये फॉर्म D दर्शविला आहे.)

अ. सर्व संबंधित मुद्दे भरणे आवश्यक आहे.

ब. प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेच्या आधि फॉर्म समुचित प्राधिकारी यांचेकडे जमा करणे.( नियम ९ पोटनियम ८)

III) फॉर्म E ची पडताळणी -(अनुवंशशास्त्रीय प्रयोगशाळा) (परिशिष्ठ ९ मध्ये फॉर्म E दर्शविला आहे.)

अ. सर्व संबंधित मुद्दे भरणे आवश्यक आहे.

ब. गरोदर मातेचे संमतीपत्र फॉर्म G मध्ये असणे आवश्यक आहे.(परिशिष्ठ १०)

क. प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेच्या आधि फॉर्म समुचित प्राधिकारी यांचेकडे जमा करणे.( नियम ९ पोटनियम ८)

- बाह्यरुग्ण नोंदवही व फ फॉर्मची पडताळणी करावी. (नियम ९ पोटनियम १) एकुण तपासलेल्या रुग्णांची संख्या व एकुण फॉर्म यांचेमध्ये तफावत नसावी याची खात्री करावी. तपासणी केल्यानंतर काही त्रुटी आढळल्यास समुचित प्राधिकारी यांनी आवश्यक ती कार्यवाही करणे अपेक्षित आहे..( कलम ३० नियम १२ पोटनियम १)

- कलम २० पोटकलम १ नुसार सोनोग्राफी धारकास कारणे दाखवा नोटीस देवून सदरच्या सोनोग्राफी केंद्राची नोंदणी रद्द अथवा निलंबित का करु नये याचे स्पष्टीकरण मागवावे. (कारणे दाखवा नोटीसचा नमुना परिशिष्ठ ११ मध्ये नमूद आहे.) निलंबन आणि नोंदणी रद्द याबाबतच्या मार्गदर्शक सूचना परिशिष्ठ १२ मध्ये नमूद आहेत. (तपासणीसंबंधित नियम आणि कारणे दाखवा नोटीस संबंधी कायदेशीर तरतूदी खालील चौकटीत दाखविलेले आहेत.)

- आवश्यकता असल्यास कलम ३० नुसार शोध प्रक्रिया पुर्ण केल्यानंतर सोनोग्राफी मशीन व सोनोग्राफी संबंधितील सर्व नोंदी व सर्व दस्त ऐवज सील करावे. (नियम १२ पोटनियम १)

- प्रथम वर्ग न्यायदंडाधिकारी व महानगर दंडाधिकारीयांचे कोर्टात कलम २८ नुसार गुन्हा दाखल करावा. गुन्हा दाखल करावयाचा नमुना परिशिष्ठ १३ मध्ये दाखविला आहे.

२५७

## तपासणी संबंधित कायदयातील कलमे -

- कोणत्याही व्यक्तीने कुठल्याही ठिकाणी गर्भलिंग निदान/गर्भलिंगनिदान तंत्राचा गैरवापर केल्याचे तसेच कायदयाचा भंग केले असल्याचे आढळून आल्यास समुचित प्राधिकारी यांना त्वरीत कायदेशीर कारवाई करण्याचा अधिकार आहे. तसेच समुचित प्राधिकारी हे स्वतःही उपलब्ध माहितीच्या आधारे शोध प्रक्रिया व तपासणी करुन कार्यवाही करु शकतात. कलम १७ (४)(ई).
- एखाद्या सोनोग्राफी केंद्राच्याबाबत तक्रार प्राप्त झाल्यास समुचित प्राधिकारी हे सोनोग्राफी केंद्रधारकास कायद्याचा भंग केले असल्याने स्वतः कारणे दाखवा नोटीस देऊ शकतात. सदर केंद्रधारकाची नोंदणी रद्द अथवा निलंबित का करु नये याचे स्पष्टीकरण मागवू शकतात (कलम २० पोटकलम १)
- कारणे दाखवा नोटीस दिल्यानंतर सोनोग्राफी केंद्रधारकास पुरेसा वेळ व वाजवी संधी देवून त्यांचे म्हणणे ऐकल्यानंतर समुचित प्राधिकारी यांनी सदरची बाब जिल्हा सल्लागार समितीसमोर अनुवंशशास्त्रीय प्रयोगशाळा, अनुवंशिक समुपदेशन केंद्र व सोनोग्राफी केंद्र यांची नोंदणी रद्द किंवा निलंबित करणेकरीता सल्ला घेणेकरीता प्रस्ताव ठेवावा. (कलम २० पोटकलम २)
- जरी कलम २० पोटकलम १ आणि २ नुसार समुचित प्राधिकारी यांनी नोटिस देणे आवश्यकता असले तरी नोटीस न देताच एखादे सोनोग्राफी केंद्राची नोंदणी रद्द करण्याचा अधिकार समुचित प्राधिकारी यांना आहे. परंतु असे करताना समुचित प्राधिकारी यांनी रास्त कारण देवून व सदरची बाब ही लोकहितजनार्थ असल्याचे लेखी दयावे. (कलम २० पोटकलम ३)
- कलम २०(३) नुसार कारवाई केलेनंतर केंद्रधारकास त्यांचे केंद्राची नोंदणी रद्द का करु नये अशी नोटीस दयावी. त्यांचे म्हणणे मांडण्यासाठी व खुलासा सादर करणेसाठी संधी दयावी. त्यानंतर कलम २०(१) (२) नुसार नोंदणी रद्द करावी व न्यायालयात केस दाखल करावयाची कार्यवाही करावी.

६) शोध आणि जप्ती प्रक्रिया

***शोध आणि जप्ती प्रक्रिया कशी करावी याबाबतची मार्गदर्शक सूचना-***

- समुचित प्राधिकारी यांना असलेल्या अधिकारानुसार संशयित व कायदयाचा भंग करीत असलेल्या अनुवंशीक प्रयोगशाळा / अनुवंशिक समुपदेशन केंद्र / सोनोग्राफी केंद्र येथे वाजवी वेळेत शोध प्रक्रिया व परिक्षण करु शकतील.सदर परिक्षणामध्ये जर समुचित प्राधिकारी यांना जर संबंधितांविरोधात संशय अथवा खात्री असल्यास सर्व नोंदवहया, दस्तऐवज, पावत्या, पुस्तके, जाहिराती, मशीन आणि इतर उपकरणे यांची सील व जप्ती करुन संबंधित दप्तर गुन्हयामध्ये पुरावे म्हणून सादर करु शकतील.
- फौजदारी प्रक्रिया संहिता १९७३ परिशिष्ठ १८ आणि मार्गदर्शक सूचना कलम ३० (परिशिष्ठ १२) चा अवलंब करुन सील व जप्ती प्रक्रिया पुर्ण करावी. (कलम ३० पोटकलम २)
- सील व जप्तीचा नमुना, पंचनामा/जप्ती ममो आणि केंद्रांची नोंदणी रद्द करणे व निलंबन करणे यांचे नमुन्याचे स्वरुप (परिशिष्ठ १२) मध्ये दिलेले आहे.
- जप्तीच्या पावतीमध्ये आवश्यक कागदपत्रे, इतर सामान आणि आढळून आलेल्या इतर वस्तु, जप्तीचे साहित्य यांचा तपशील घेवून त्याची दुसरी नक्कल प्रत तयार करुन जप्तीच्या ठिकाणी प्रत्येक पानावरती समुचित प्राधिकारी किंवा समुचित प्राधिकारीच्या वतीने प्राधिकृत केलेल्या व्यक्तीची सही तसेच साक्षीदारांच्या सहया घ्याव्यात.(कलम १२ पोटनियम २)
- ज्या व्यक्तीच्या ताब्यात दस्तऐवज, इतर साहित्य, इतर बाबी आहेत त्या व्यक्तीस जप्तीची पावती देण्यात यावी. तसेच जप्त केलेल्या दस्तऐवज व उपकरणे, व इतर साहित्यांची यादी व जप्तीच्या पावतीसह पोहच घ्यावी. (कलम १२ पोटनियम ३)
- जर कोणतीही व्यक्ती जप्तीची पावती घेण्यास उपलब्ध नसल्यास केंद्र मालकास/व्यवस्थापकास रजिस्टर पोस्टाने पोहोच करावे.
- जप्त साहित्य हे नाशवंत स्वरुपाचे असल्यास आवश्यकत असेल तर सदर जप्तीची व्यवस्था अचूकतेने होईल हे पहावे व त्याच्या जतनाची व्यवस्था व्यवस्थितरित्या करावी. व त्याचे विश्लेषण आणि चाचण्या करण्यासाठी संबंधित विभागाकडे पाठवण्यात यावे. (कलम १२ पोटनियम ४)
- जर कोणत्याही कारणास्तव शोध व सील प्रक्रिया पुर्ण होत नसेल तर समुचित प्राधिकारी यांनी जप्त केलेले दस्तऐवज परिसरातून दुर करुन तो परिसर सील करावा जेणेकरुन उपलब्ध पुराव्याची अदलाबदल होणार नाही.(कलम १२ पोटनियम ५)

२५८

## तपासणी संबधित कायदयानुसार शोध व सील प्रक्रिया -

- सोनोग्राफी मालक/यंत्रचालक/डॉक्टर यांनी समुचित प्राधिकारी यांना नोंदणीकृत/अनोंदणीकृत दवाखाने, नर्सींग होम, गाडया, दुकाने येथे शोध प्रक्रिया करणेसाठी अनुमती दयावी. व सर्व दस्तऐवज, मशीन, उपकरणे तपासणीकरीता उपलब्ध करुन देणे बंधनकारक आहे. (नियम ११ पोटकलम १)

- जर सोनोग्राफी केंद्र किंवा सोनोग्राफी सुविधेशी संबंधित असलेले मशीन, स्कॅनर किंवा गर्भलिंग निदान करता येणेजोगे कोणतेही उपकरणे अ नोंदणीकृत आढळून आल्यास ते सील व जप्ती करण्याचे समुचित प्राधिकारी यांना अधिकृत अधिकार आहेत. जर मशीन सील व जप्त केली असेल (नियम ११ पोटकलम २) आणि कायदयाची कलम २३ नुसार कारवाई केली असल्यास सदरचे मशीन किंवा उपकरण हे सरकारी मालमत्ता म्हणून जमा केली जाते. जप्ती प्रक्रिया पुर्ण झाल्यानंतर सदरच्या व्यक्तीचे म्हणणे ऐकुन घेण्याकरीता संधी दिलेनंतर सदरची मशीन/उपकरण कायदयाच्या आदेशाशिवाय डिसील करु शकत नाहीत.

- समुचित प्राधिकारी किंवा त्यांच्या वतीने प्राधिकृत केलेली व्यक्ती वाजवी वेळेत अनुवंशशास्त्रीय चिकित्सालय, अनुवंशिक समुपदेशन केंद्र व सोनोग्राफी केंद्र, imagine center येथे दोन किंवा तीन साक्षीदारांसमवेत सर्व दस्तऐवजांची, रेकॉर्ड, पुस्तिका, जाहिरात किंवा इतर साहित्य वस्तूची तपासणीसाठी प्रवेश करुन तद्क्षणी सील आणि जप्ती प्रक्रिया करु शकतात. सदर पुरावे गुन्हयामध्ये शिक्षा होण्याकरीता पुरावे म्हणून सादर करु शकतील.(नियम १२ पोटकलम १)

- एखादी कृती कायदयातील तरतुदी नुसार चांगले करण्याकरीता केली असल्यास राज्य सरकार, समुचित प्राधिकारी किंवा कोणताही राज्य सरकार व केंद्र सरकारने प्राधिकृत केलेल्या अधिकारी यांचेवर फोजदारी कारवाई करु नये.

## ७) डिकॉय ऑपरेशन साठी मार्गदर्शक सूचना

- लिंग निदान करणारे केंद्र / मदत करणाऱ्या केंद्राच्या विषयी पुरावा व माहिती डिकॉय प्रक्रिया राबविण्यासाठी कशी मिळवावी. ( संदर्भ - विस्तृत मार्गदर्शक सूचनासाठी परिशिष्ट १६ पहावे)
- १४ ते २२ आठवड्याची (खात्रीलायक) गरोदर स्त्री निवडावी तिच्या सोबत तिला सर्व बाबींची व परिस्थितीची कल्पना दयावी. आणि डिकॉय प्रक्रियेत सहभागी होण्यासाठी तिचे संमतीपत्र भरुन घ्यावे. (परवानगी / संमतीपत्र नमुन्यासाठी परिशिष्ट १४ पहावे.)
- सदरहू स्त्रीच्या नातेवाईकांची परवानगी घ्यावी. उदा. पती, सासु, आई, इत्यादि. त्यानाही समजेल अशा भाषेत पुर्ण प्रक्रिया समजावून सांगावी व समुपदेशन करावे.
- पुर्वसापळा किंवा पुर्व डिकॉय प्रक्रिया मेमो अथवा पंचनामा तयार करावा. गरोदर माता या प्रक्रियेत सहभागी होण्यास तयार असल्याचे प्रतिज्ञापत्र भरुन घ्यावे.
- सदरहू प्रक्रियेमध्ये वापरात येणाऱ्या चलनी नोटांचे क्रमांक नोंदवून ठेवावे. या चलन संख्या पुर्वसापळा पंचनामा / प्रतिज्ञापत्रात नमूद करण्यात याव्यात. गरोदर माता किंवा साक्षीदार यांना या चलनी नोटा देण्यात याव्यात. या प्रक्रियेमध्ये त्यांचेकडे इतर कोणत्याही चलनी नोटा नाहीत याची खात्री करावी.
- शक्य असेल तर, सदरहू स्त्री बरोबर दोन पंच सोबत जाण्यासाठी / असण्यासाठी तयार करावेत. सदरहू स्त्री अथवा पंच यांचेकडे गुप्त व सहज हाताळण्याजोगी दृकश्राव्य यंत्रणा तयार ठेवावी.
- जर व्हीडीओ कॅमेरा वापरण्यात येणार असेल, तर पुर्ण प्रक्रियेमध्ये व डिकॉय पश्चात तपासणी या कालावधीत चालू राहील, याची दक्षता घ्यावी.
- दृकश्राव्य उपकरण सहजपणे आणि योग्यरितीने वापरता येईल याचे प्रशिक्षण गरोदर स्त्री आणि पंचांना देण्यात यावे. तीन मुख्य साक्षीदार व दोन निरिक्षक यांचा संच या प्रक्रियेत उपयुक्त ठरेल. या संघामधील सदस्य हे एकमेकांशी परिचीत असावेत. आणि त्यांना उत्तम प्रकारे अमौखिक संवाद साधता यावा. त्यांना पुरावा गोळा करणे, कायदयाबाबत चांगले ज्ञान आणि डिकॉय प्रक्रियेत यशस्वी सहभाग घेण्यासाठी त्यांना प्रशिक्षण देण्यात यावे.
- (गरज पडल्यास ) नजीकच्या पोलिस स्टेशन व पोलिस अधिकारी यांचे दुरध्वनी क्रमांक त्यांचे जवळ असावेत. तसेच गरजेनूसार साध्या वेशातील पोलिस संरक्षण घेण्यात यावे.
- ही डिकॉय प्रक्रिया जेथे चालू असेल त्या ठिकाणाच्या जवळ संबंधित समूचित प्राधिकारी किंवा समूचित प्राधिकाऱ्याने त्या विभागाचे प्राधिकृत केलेले समूचित अधिकारी यांनी उपस्थित रहावे. जेणेकरुन सुचना मिळताच त्यांना हस्तक्षेप करता येईल.

- सदरहू डिकॉय प्रक्रिया यशस्वी झाल्याचे कळाल्यानंतर समुचित प्राधिकारी यांनी योग्य ती काळजी घ्यावी आणि सदरहू केंद्राचे मालक / कर्मचारी यांचेवर निरिक्षण ठेवावे.
- आरोपी कोणालाही कुठल्याही प्रकारचे दुरध्वनी किंवा संवाद साधू शकणार नाहीत याची दक्षता घ्यावी. या केंद्रातील सर्व संवाद उपकरणे तसेच त्यांचे दुरध्वनी बंद करण्यात यावेत.
- पंचनाम्यामध्ये समूचित प्राधिकाऱ्याने या प्रक्रियेत वापरलेल्या चलनी नोटांची नोंद करावी. व चलनी नोटांच्या क्रमांकाची पडताळणी करुन पंचनाम्यामध्ये नोंद घ्यावी. (डिकॉय प्रक्रिया संबंधित पंचनाम्याचा स्वरुप(Sample) नमूना यासाठी परिशिष्ट क्र. १५ पहावे.)
- चौकशीनंतर समूचित प्राधिकाऱ्याने आरोपीचा जाब जवाब लिखीत अथवा त्याच्या / तिच्या हस्तलिखीत स्वरुपात नोंदवावा.
- सह आरोपीचे (इतर रुग्णसेवा देणारे कर्मचारी, एजंट, जनसंपर्क अधिकारी, ) जवाब सुध्दा नोंदविण्यात यावेत.
- सदरहू केंद्राची बारकाईने व सखोल तपासणी करावी आणि सर्व महत्वाचे दस्तऐवज ताब्यात घेऊन सील करावेत. पुर्ण परिसर, घर , गॅरेज, रुग्णालय, याची सखोलपणे पहाणी करुन करावी जेणेकरुन अनोंदणीकृत सोनोग्राफी मशीन किंवा कायद्याचे उल्लघंन केलेली बाब आढळून येईल.
- सर्व अधिकृत व अनाधिकृत मशीन ताब्यात घेण्यात याव्यात. जप्त केलेल्या मशीन या प्रत्यक्षात सदरहू केंद्रधारकाकडे राहतील परंतू त्याचा समूचित प्राधिकारी यांचा ताबा असेल. पुढील आदेश मिळेपर्यंत सील केलेल्या मशीन केंद्रधारकाकडे देण्यात येतील. तथापि सील खराब होणार नाही आणि त्याचा वापर होणार नाही, याची जबाबदारी केंद्र धारकाची राहील. पंचनामा झाल्यानंतर सर्व जप्त-केलेल्या वस्तू, साहित्य, कागदपत्रे व मशीन याची लिखीत स्वरुपात पोच पावती आरोपीस देण्यात यावी.
- तपासणी अहवाल व्यापक व कसून तयार करण्यात यावा. ( या मार्गदर्शक सूचनांच्या परिशिष्ट क्र.६ मधील चेक लिस्ट पहावी.)
- गरोदर माता व पंचाचा जबाब गुन्हयाच्या ठिकाणीच नोंदविण्यात यावा. आणि दृकश्राव्य पुरावे, व्हीडीओ कॅसेट, इ. ताब्यात घेण्यात यावे.
- जर दृकश्राव्य माध्यमातून रेकॉर्डीग केले असेल तर त्याची सीडी बनवून न्यायालयात गुन्हा नोंदविताना सादर करण्यात यावे. या दृकश्राव्य रेकॉर्डीग मधील माहितीमध्ये कुठल्याही प्रकारचा बदल करण्यात येऊ नयेत. गुन्हा नोंदवितांना या माध्यमातील सर्व संवाद कागदावर लिखीत स्वरुपात लिहून घ्यावेत व केस दाखल करतेवेळी सादर करावेत.

- सर्व कागदपत्रे उदा. दोनही मुळ नोंदणी प्रमाणपत्रे, बोर्ड (सुचना फलके), फॉर्म एफ, गरोदर मातेचे प्रतिज्ञापत्र, डॉक्टरांचे घोषणापत्र, बाह्यरुग्ण विभाग नोंदवही, जन्म नोंदवही, कायद्याची प्रत, संदर्भ पत्रिका, नोंदणी संबंधी सर्व संवाद व दस्तऐवज, सोनोग्राफी नोंदणी संबंधीचे दस्तऐवज जप्त करण्यात यावेत. समुचित प्राधिकारी व आरोपी यांच्यामधील सर्व पत्रव्यवहार ताब्यात घेण्यात यावा.
- डिकॉय प्रक्रियेतील गरोदर स्त्री, तिच्या सोबत त्या केंद्रात असणाऱ्या लिंग निदान सेवा संबंधिच्या सर्व रुग्णांचे नातेवाईक व नातेवाईकांचे जबाब, त्यांचा पत्ता व संपर्क माहितीसह नोंदविण्यात यावा. गरज पडल्यास त्यांना चौकशी दरम्यान बोलविण्यात यावे.
- सर्व चौकशी सखोलपणे पुर्ण केली याची खात्री केल्यानंतर लगेचच संबंधित न्यायालयात तक्रार दाखल करण्यात यावी. सोबत चौकशी दरम्यान व डिकॉय प्रक्रिया दरम्यान मिळालेले सर्व पुरावे जोडण्यात यावेत.
- समुचित प्राधिकारी हा फिर्यादी असल्याने त्याने स्वतः अथवा त्याचा / तिचा अधिकृत प्रतिनिधी केस संबंधी प्रत्येकवेळी न्यायालयात हजर रहावे.

## ८) तक्रारीस प्रतिसाद देण्यासंबंधिच्या मार्गदर्शक सुचना.

- गर्भधारणापूर्व आणि प्रसवपूर्व निदान तंत्रे (लिंग निवड प्रतिबंध) कायदयाचे उल्लंघन संबंधी तक्रारीस प्रतिसाद कसा दयावा.
- तक्रार प्राप्त झाल्यानंतर सर्व संबंधित चौकशी २४ तासाच्या आत सुरु करण्यात यावी आणि तक्रार प्राप्त झाल्याच्या ४८ तासात पुर्ण करण्यात यावी. (समुचित प्राधिकारी यांचेसाठी मानक कार्य मार्गदर्शक तत्वे यानूसार नियम १८ अ(३)
- मुळ कागदपत्रे ताब्यात घेऊन तक्रार दारास कागदपत्रे प्राप्त झाल्याचे पोच पावती देण्यात यावी. [नियम १८ ए (३) (iii) ]
- अज्ञात व्यक्तीकडून तक्रार प्राप्त झाल्यास आणि तक्रार दुरध्वनीद्वारे किंवा ऑनलाईन संकेतस्थळावर, ई-मेल किंवा पत्राद्वारे प्राप्त झाल्यास दुरध्वनी क्रमांक तक्रारीची वेळ व तारीख इत्यादि सर्व माहितीची नोंद करावी. सदरहू तक्रारीची लिखीत प्रत तयार करुन अभिलेख्यामध्ये ठेवण्यात यावी. सोबत संबंधित कागदपत्र प्राप्त झाले असल्यास उदा. पॉकीट, (लिफापा) तक्रारीसोबत जोडून ठेवावे.
- तक्रारीनूसार संबंधित केंद्राची तपासणी करण्यात यावी. नियमानूसार तपासणी करुन तपासणी अहवाल तयार करण्यता यावा. (नियम १२ (१) (२) आणि तपासणी सुचक यादी (चेक लिस्ट) परिशिष्ट ६ नुसार)
- जर सोनोग्राफी केंद्राने नियमाचा भंग केल्याचे आढळून आल्यास त्यांची नोंदणी कलम २० (१)(२)(३) नुसार त्वरित निलंबित करण्यात यावी. आणि शोध व जप्ती प्रक्रिया पुर्ण करण्यात यावी.
- साक्षीदारांचे जबाब नोंदविण्यात यावेत. सर्व पुरावे एकत्रित करुन पंचनामा तयार करण्यात यावा.
- साक्षीदारांचे व तक्रारदारांचे जबाबपुरावा म्हणून दाखल करण्यात यावेत.
- तक्रारदार हा फिर्यादीचा साक्षीदार समजण्यात यावा.
- नियमानूसार कार्यवाही पूर्ण करण्यात यावी. आणि ही फिर्यादप्रथमवर्ग न्यायदंडाधिकारी / महानगर न्यायदंडाधिकारी यांच्या कोर्टात दाखल करण्यात यावी. कलम २८ (२).
- पोलिस खात्याचा पीसीपीएनडीटी कायदयामध्ये सहभाग नसल्याने प्रथम माहिती अहवाल (FIR)टाळण्यात यावा. नियम १८ ए (३) (iv).
- वैद्यकीय गर्भपात कायदा १९७१ (३४/१९७१) मधील बाबींचे उल्लंघन होणार नाही याची खात्री करण्यात यावी. व त्यानुसार पीसीपीएनडीटी (लिंग निवड प्रतिबंध) नियम १९९६ (नियम १८ए (५)(V) मधील तरतुदींची अमलबजावणी करावी.

## लक्षात ठेवा

- सामाजिक संस्था, पत्रकार किंवा वैयक्तिक तक्रार पंधरा दिवसांचे नोटीस दवारे (कायदयाच्या कलम २८ (१) बी)समुचित प्राधिकाऱ्यास प्राप्त झाल्यास समुचित प्राधिकारी यांनी तक्रारीचे आधारे कार्यवाही करावी. अशी कार्यवाही न केल्यास तक्रारदाराने प्रत्यक्ष न्यायालयात तक्रार दाखल केल्यासारखे आहे. आणि कलम १७ (समुचित प्राधिकारी यांची जबाबदारी) चा भंग केल्यासारखे आहे.

- कलम २४ नुसार गरोदर स्त्रीवर कोणतीही कार्यवाही करण्यात येऊ नये. तिला कायदयादवारे संरक्षण देण्यात आले आहे.

2६५

## ९) फौजदारी गुन्हा/तक्रार दाखल करण्याकरीता मार्गदर्शक सूचना

**पीसीपीएनडीटी कायदयानुसार फौजदारी गुन्हा/तक्रार दाखल कशी करावी ?**

गर्भधारणापूर्व व प्रसुतिपूर्व निदान तंत्र (लिंग निवडीस प्रतिबंध) कायदयाचे कलम २८ नुसार JMFC/MetroPlitian यांचे न्यायालयात केसेस दाखल करणेसाठी समुचित प्राधिकारी यांना प्राधिकृत केले आहे. केस दाखल करणेचे प्रक्रिया ४ सेंगमेंटमध्ये विभागली आहे.

अ) न्यायालयात केस/ तक्रार दाखल करण्याची पूर्व प्रक्रिया
ब) गुन्हयाच्या संबंधित दाखल करावयाची कागदपत्रे किंवा परिशिष्ठ.
क) प्रत्यक्ष गुन्हा /तक्रार दाखल करतेवेळी
ड) इतर सूचना

**अ) तक्रार केस दाखल करावयाची पूर्व प्रक्रिया -**

- समुचित प्राधिकारी किंवा समुचित प्राधिकारी यांच्या वतीने प्राधिकृत केलेले अधिकारी यांनी केंद्र तपासले असतील तर तपासणीच्या वेळी जर पीसीपीएनडीटी कायदयाच्या तरतुदींचा भंग झाल्याचे आढळून आल्यास त्यांनी भंग केलेल्या सर्व तरतूदी नमूद कराव्यात. आणि जप्ती पावती/पंचनामा स्वतंत्र साक्षीदाराच्या मदतीने तयार करावा (नियम १२).
- पंचनामा हा पंचांच्या उपस्थितीतच तयार करावा. साक्षीदार केवळ जप्त केलेल्या साहित्य ओळखण्यासाठी व साक्ष देणेकरीता असतात.
- जर तपासणी अधिकाऱ्यास आवश्यकता वाटल्यास कायदयांचा सर्व साहित्यांसह म्हणजे मशीन, सर्व दस्तऐवज सील व जप्त करु शकतात. तपासणी अधिकाऱ्याने जप्त व सील केलेल्या बाबींची यादी असलेली एक प्रत सोनोग्राफी केंद्रधारकास पुरवावयाची आहे. आणि त्याची पोहोच पावती सोनोग्राफी केंद्रधारकाकडून किंवा त्याच्या/तिच्या वतीने प्राधिकृत असलेल्या व्यक्तीकडून घ्यावयाची आहे. (कलम ३० नियम १२ पोटनियम ३)
- समुचित प्राधिकारी यांना सोनोग्राफी केंद्रामध्ये कायदयाच्या तरतूदींचा भंग झाला असल्याचे निदर्शनास आल्यास कारणे दाखवा नोटीस दयावयाची आहे. व त्याबाबत केंद्रधारकास स्पष्टीकरण देण्यास सांगावयाचे आहे. सदरचे स्पष्टीकरणाचे विचार-विनिमय करणेकरीता आणि नोंदणीकृत केंद्राची नोंदणी निलंबित करणेकरीता जिल्हा सल्लागार समुचित प्राधिकारी स्वतःची शिफारस यांनी सादर करावयाची आहे. कारवाई करण्याचे स्पष्ट कारण सांगून समुचित प्राधिकारी नोंदणीकृत केंद्राची नोंदणी निलंबन रद्द करु शकतात.
- जर समुचित प्राधिकारी यांना आवश्यकता वाटल्यास गुन्हा/तक्रारीच्या पुराव्याकामी मशिन किंवा इतर साहित्य सील करु शकतात. काही प्रकरणांमध्ये कायदा सुव्यवस्था व जनहितार्थाच्या दृष्टीने नोंदणीकृत केंद्राची नोंदणी नोटीस न देता रद्द करु शकतात परंतु केलेल्या अशा कार्यवाहीची नोंद लिखित स्वरुपात असावी.(कलम २० पोटकलम ३)
- (काही प्रकरणांमध्ये जनहितार्थाची प्रकरणे सोडून) सोनोग्राफी केंद्राची नोंदणी रद्द करावयाच्या आधी समुचित प्राधिकारी कारणे दाखवा नोटीस देतात आणि सोनोग्राफी

केंद्रधारकास पुरेसा वेळ देवून नोटीसीला उत्तर म्हणून स्पष्टीकरण मागवू शकतात. सदरचे उत्तर [illegible] व त्याबाबतचे निर्णय घेण्याकरीता ठेवू शकतात.

अ) नोंदणीकृत केंद्राची नोंदणी रद्द करणेकरीता

ब) कारणे दाखवा नोटीशीस प्राप्त झालेले उत्तर अथवा स्पष्टीकरण समाधानकारक नसल्यास पुढील न्यायालयीन कार्यवाहीकरीता

- जर केंद्रधारकाने अथवा सोनोलॉजिस्टने, सहाय्यकाने, कर्मचाऱ्याने गुन्हयाची कबुली दिली असल्यास त्याची अचूकपणे लिखित स्वरुपात जबावाची नोंद करावयाची आहे. आणि सदरचा जबाब हा मालकाच्या सहीने अथवा त्यांच्या वतीने प्राधिकृत केलेल्या व्यक्तीच्या सहीने असावा. असे करणे शक्य नसल्यास जबाबाची नोंद घटनास्थळी उपस्थित असलेल्या कोणाकडूनही मालकासमोर करुन घ्यावी. हे सुदधा शक्य नसल्यास नोंदविलेला जबाब त्याला किंवा तिला वाचून स्पष्टीकरण देवून सांगावा. त्याची/तिची त्यावर सही देवनू नमूद करावे की, त्याने किंवा तिने सदरचा जबाब वाचल्यानंतर त्यावर काळजीपूर्वक सही केली असून जबाबातील सर्व नोंदी/बाबी त्याला किंवा तिला समजले असून नमूद केलेली नोंदीबाबत पुर्ण जाणीव असून कोणाच्याही बळजबरी किंवा दबावाखाली न येता त्याने किंवा तिने सही केली आहे. हे न्यायालयात केस सिदध होण्यास फायदयाचे ठरले.

तपासणी अधिकारी यांनी तपासणी अहवाल दिनांक वेळ जागेसहित (संक्षिप्त नकाशा) सविस्तर तयार करावा.

**ब) गुन्हयाच्या संबंधित दाखल करावयाची कागदपत्रे किंवा परिशिष्ठ (परिशिष्ठ १७ मध्ये नमुना चेकलिस्ट दिली आहे तक्रार दाखल करताना सर्व मुळ कागदपत्र सादर करावीत –**

- कायदयानुसार आवश्यक असलेली संपूर्ण कागदपत्रे अचूकपणे दाखल करणे आवश्यक आहे. खाली नमूद केलेल्या यादीनुसार कागदपत्रे दाखल करावयाची आहेत.

अ) राज्यसरकारच्या राजपत्रामध्ये समुचित प्राधिकारी असलेली अधिसूचनेची मुळ प्रत दाखल करणे आवश्यक आहे.

ब) तपासणीच्या वेळी समुचित अधिकारी यांचेकडून प्राप्त असलेले अधिकृत पत्र/त्यावतीने प्राधिकृत केले असल्याची पत्राची मुळप्रत सदर पत्रामध्ये दिनांक तपासणीची निश्चित जागा नमूद असावी. (शक्यतो घटनास्थळीच्या संक्षिप्त नकाशासह)

क) जप्ती पावतीसह संपुर्ण तपासणी अहवाल

ड) समुचित अधिकाऱ्याने दिलेली कारणे दाखवा नोटीस

इ) पंचनामा, सील आणि जप्त केलेली, दस्तऐवज, साहित्य (पोचपावती यादीसह)

फ) सोनोग्राफी केंद्रमालकाचा/चालकाचा जबाब

ग) सोनोग्राफी केंद्रमालकाचे खुलाश्याची / उत्तराची प्रत

ह) जिल्हा सल्लागार समितीने केलेल्या शिफारशीची प्रत

ई) नोंदणी रद्द/निलंबित केलेल्या आदेशाची प्रत

ज) तपासणी करतेवेळी मिळालेले इतर कोणतेही कागदपत्रे/दस्तऐवज

**क)प्रत्यक्ष गुन्हा/तक्रार दाखल करतेवेळी**

समुचित प्राधिकारी किंवा त्यांच्यावतीने प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यांमार्फत गुन्हा/तक्रार दाखल होणे आवश्यक आहे. (गुन्हा/तक्रारीच्या स्वरुपाचा नमुना परिशिष्ठ १३ मध्ये दाखविला आहे.)

अ) गुन्हा/तक्रार दाखल करतेवेळी समुचित प्राधिकाऱ्याने सर्व कागदपत्रे कायदेशीर तज्ञाच्या सल्ल्याने आणि तपासणीच्या वेळी असलेल्या सर्व वस्तुस्थितीनुसार गुन्हा/तक्रारीचा अहवाल तयार करावा.

ब) सदरची प्रक्रिया जो कोणी जिल्हा सल्लागार समितीमध्ये / सहाय्यक सरकारी वकील/ जिल्हा सरकारी वकिल/विशेष सरकारी वकील असेल अशा कायदयातज्ञाचा मार्गदर्शनानुसारच करावी.

क) घटनेच्या सत्यपरिस्थितीचे संपुर्ण वर्णन तक्रारीमध्ये नमुद करावे.

ड) आवश्यक असलेल्या व्यक्तींना आरोपी करावे आणि त्यांचा अचूक पत्ता तक्रारीमध्ये नमुद करावा.

इ) न्यायालयामार्फत समन्स आदेश निर्गमित झाल्यानंतर प्रक्रिया शुल्क न्यायालयात जमा करावे. आवश्यक असलेले न्यायालयीन शुल्क आणि प्रक्रिया शुल्क पीसीपीएनडीटी खात्यातून अदा करावे.

फ) सर्व मुळ कागदपत्रे जमा करावे. सदरच्या कागदपत्रांची एक झेरॉक्स समुचित प्राधिकारी आणि संबंधित वकील/सरकारी वकील यांचेकडे ठेवावी.

ग) सर्व कागदपत्रांची एक प्रत कोर्टाचे आदेश असल्यास आरोपीला प्रदान करावी.

ह) अचूक आरसीसी (नोंदणीकृत गुन्हा क्रमांक) क्रमांक घ्यावा. न्यायालयातील अधिक्षकांच्या मदतीने केस दाखल झाल्याची खात्री करावी. अचूकपणे पुढची तारीख घ्यावी. समुचित अधिकाऱ्याकडे असलेल्या फाईलमध्ये सद्याची तारीख, न्यायालयाचे नाव न्यायालयीन प्रक्रियेबाबत सविस्तर नमूद करावे.

ड) इतर सूचना

अ) साक्षीदार आणि पंच विश्वसनीय आणि स्वतंत्र असावेत जेणेकरुन न्यायालयीन केस चालू असताना ते फितूर होणेचा धोका कमी होईल.

ब) तपासणीचा वेळ,दिनांक महत्वाची असून त्यांची नोंद अचूकपणे करावी.

क) तपासणीकरतेवेळी सर्व मुद्यांची नोंद झाली आहे याबाबत खात्री करावी.

ड) तपासणी पुर्ण झाली आहे याची खातरजमा करणेसाठी तपासणी सूचीची मदत घ्यावी.

इ) केंद्रधारकास त्याचे स्पष्टीकरण देणेकरीता पुरेसा वेळ दिला आहे याची खात्री करावी आणि यादरम्यानच्या काळात केंद्राची नोंदणी रद्द अथवा निलंबित चे आदेश निर्गमित होणार नाहीत याची खात्री करावी.

फ) मुळ कागदपत्रे दाखल करावी आणि न्यायालयात नमूद करावे कि, समुचित अधिकाऱ्याने मुळ कागदपत्रे दाखल केली आहेत. सर्व कागदपत्रास निशाणी क्रमांक पाडून घ्यावा.सर्व कागदपत्रांची छायांकित प्रत समुचित प्राधिकाऱ्याने ठेवावी.

ग) न्यायालयीन केसबाबत नियुक्त केलेल्या व्यक्तीने सहाय्यक सरकारी वकिलांच्या सहाय्याने पाठपुरावा आणि नियमित चर्चा करावी जेणेकरुन न्यायालयात दोष सिध्द होतील.

ह) समुचित अधिकाऱ्याने केसच्या रोजनाम्यावर देखरेख ठेवणे ही जबाबदारी आहे.

ई) एकदा आरोप निश्चित झाले कि, डॉक्टरांची वैद्यकिय पदवी रद्द करण्याचा अर्ज त्याचबरोबर आरोप निश्चित झालेल्याची न्यायालयीन सही शिक्क्याची प्रतीसह राज्य वैद्यकिय परिषद (MMC) कलम २३(२) यांचेकडे त्याचे किंवा तिचे परिषदेतील नोंदणी पहिल्या गुन्ह्यासाठी पाच वर्षेकरीता आणि त्यानंतरच्या गुन्ह्याकरीता कायमस्वरुपी निलंबीत करणेसाठी दाखल करावे.

## परिशिष्ठ १

## (नमुना अ)

(पहा नियम ४ (१) आणि ८ (१)

(आवश्यक सहपत्र आधार दस्ताऐवजासहीत दोन प्रतीत सादर करणे आवश्यक आहे.)

अनुवंशशास्त्रीय समुपदेशन केंद्र / अनुवंशशास्त्रीय प्रयोगशाळा / अनुवंशशास्त्रीय चिकित्सालय / सोनोग्राफी चिकित्सालय / प्रतिमा केंद्र यांच्या नोंदणीसाठी, किंवा नोंदणीच्या नुतनीकरणासाठी सादर करावयाच्या अर्जाचा नमुना

१. अर्जदाराचे नांव
( नोंदणी करु इच्छिणाऱ्या संस्थेचे नाव नमुद करा)

२. अर्जदाराचा पत्ता

३. नोंदणी करावयाच्या सुविधेचा प्रकार
(कृपया अर्ज अनुवंशशास्त्रीय समुपदेशन केंद्र / अनुवंशशास्त्रीय प्रयोगशाळा / अनुवंसशास्त्रीय चिकित्सालय / सोनोग्राफी चिकित्सालय / प्रतिमा केंद्र यांच्या नोंदणीसाठी किंवा त्यांच्या कोणत्याही एकत्रित नोंदणीसाठी आहे हे विनिर्दिष्ट करा)

४. अनुवंशशास्त्रीय समुपदेशन केंद्र / अनुवंशशास्त्रीय प्रयोगशाळा / अनुवंशशास्त्रीय चिकित्सालय / स्वनातीत चिकित्सालय / प्रतिमा केंद्र यांचे संपुर्ण नाव आणि पत्ता / पत्ते त्याचप्रमाणे दूरध्वनी क्रमांक/ फॅक्स क्रमांक/ टेलीग्राफीक, / इ-मेल पत्ता/ पत्ते)

५. संस्थेच्या मालकीचा प्रकार (वैयक्तीक मालकी/ भागीदारी / सहकारी/ इतर प्रकार असल्यास तो विनिर्दिष्ट करा.) जर संस्थेची मालकी वैयक्तीक मालकी व्यतिरिक्त असेल तर संस्थापन नियमावली आणि व्यवस्थापनाला जबाबदार असलेल्या इतर व्यक्तींची नावे आणि पत्ते सहपत्र म्हणुन सादर करा.

६. संस्थेचा प्रकार (शासकीय रुग्णालय/ व्यवस्थापकीय/ नगरपालिका रुग्णालय/ सार्वजनिक रुग्णालय / खाजगी रुग्णालय / खाजगी लहान रुग्णालय (नर्सींग होम) / खाजगी चिकित्सालय/ खाजगी प्रयोगशाळा/ इतर प्रकार असल्यास नमुद करा.

७. मंजुरी करण्यासाठी अर्ज सादर विनिर्दिष्ट प्रसुतीपूर्व निदान प्रक्रिया / चाचण्या
अ) इनव्हेंजीव्ह
I) गर्भजलपरीक्षा / कोरीयॉनिक व्होलाय अस्पीरेशन / गुणसुत्रीय / जैवरासायनीक / रेणु अभ्यास
(ब) नॉनइनव्हेंजीव/ सोनोग्राफी प्रक्रिया
जर नोंदणी केवळ अनुवंशशास्त्रीय सल्लागार केंद्रासाठी असेल तर या ठिकाणी काहीही माहिती भरु नका

८. उपलब्ध उपकरणे आणि साधने, त्यांचे उत्पादक आणि मॉडेल (स्वतंत्र कागदावरील प्रत्येकाची यादी जोडा)

९. (अ) सल्लागार केंद्रात उपलब्ध असलेल्या सुविधा

(क) खालील चाचण्यांसाठी उपलब्ध सुविधा/ उपलब्ध ठेवू शकणाऱ्या सुविधा :

(i) अल्ट्रासाऊंड

(ii) गर्भजलपरीक्षा

(iii) कोरीऑनिक व्हीलाय अस्पीरेशन

(iv) फीटोस्कोपी

(v) गर्भ बायॉप्सी

(vi) कोरडोसेंटेसीस

प्रयोग शाळेत / चिकित्सालयात खालील सुविधा उपलब्ध आहेत किंवा कसे :-

(i) गुणसुत्रीय अभ्यास

(ii) जैवरासायनीक अभ्यास

(iii) मोलेक्यूलर अभ्यास

(iv) आरोपणपूर्व अनुवंशशास्त्रीय निदान(पीजीडी)

१०. कर्मचाऱ्यांची नावे, अर्हता, अनुभव आणि नोंदणी क्रमांक सादर करणे आवश्यक(सहपत्रासह)

११. नियम ३ मध्ये निश्चीत केलेल्या नोंदणी आवश्यकतानुसार अनुवंशशास्त्रीय सल्लागार केंद्र / अनुवंशशास्त्रीय प्रयोगशाळा / अनुवंशशास्त्रीय चिकित्सालय / अल्ट्रासाऊंड चिकित्सालय/ प्रतिमा केंद्र पात्र आहेत किंवा कसे

१२. केवळ नुतनीकरण अर्जासाठी :-

(अ) नोंदणी क्रमांक

(ब) सध्याचे नोंदणी प्रमाणपत्र निर्गमित केल्याची तारीख आणि त्याची मुदत समाप्त होण्याची तारीख

१३. सहपत्राची यादी

(सहपत्रे / या अर्जाला जोडलेल्या आधार दस्तऐवजाची यादी जोडा)

तारीख

स्थान

..................................

नोंदणी करावयाच्या संस्थेच्या वतीने प्राधिकृत केलेल्या व्यक्तीचे नाव, हुद्दा व स्वाक्षरी
करण्यास प्राधिकत केलेल्या व्यक्तीचे नाव
हुददा आणि स्वाक्षरी

जे लागू नाही किंवा आवश्यक नाही त्यावर काट मारा. सर्व सहपत्रे अर्जदाराच्या स्वाक्षरीने अधिप्रमाणित करा.

# घोषणापत्र

(PCPNDT कायदा अंतर्गत नियम ४(१) नुसार)

मी श्री / श्रीम/कु/डॉ ............. ............. वडिल/पतीचे नाव ................ ......., वय ....... वर्ष, (पत्ता) .................................................................. .. या संस्थेत (नोंदणी करावयाच्या संस्थेचे नाव नमूद करा)..............म्हणून काम करीत आहे (हुद्दा नमूद करा) आणि याव्दारा घोषित करतो / करते की मी प्रसवपूर्व निदान तंत्रे (नियम व गैरवापरावील प्रतिबंध) अधिनियम, १९९४ (सन १९९४ चा अधिनियम क्रमांक ५७) आणि प्रसवपूर्व निदान तंत्रे (नियम व गैरवापरावील प्रतिबंध) नियम, १९९६ वाचले असून ते मला समजले आहेत.

मी असे देखील अभिवचन देतो की मी नोंदणी करुन इच्छीणा-या अनुवंशशास्त्रीय समुपदेशन केंद्रातील / अनुवंशशास्त्रीय प्रयोग शाळेतील / अनुवंशशास्त्रीय चिकित्सालयातील /स्वनातील चिकित्सालयातील/ प्रतिमा केंद्रातील सर्व कर्मचा-यांना सदर अधिनियम आणि नियम समजावून सांगेन आणि अधिनियमांचे आणि नियमांचे संपूर्ण पालन होईल यासाठी काळजी घेईन.

तारीख

स्थान

(.....................)
नोंदणी करावयाच्या संस्थेच्या
वतीने स्वाक्षरी करण्यास
प्राधिकृत केलेल्या व्यक्तीचे
नाव, हुद्दा आणि स्वाक्षरी
(नोदंणी करु इच्छीणा-या संस्थेचा शिक्का)
(.............................)

पोच पावती

(पहा नियम ४ (२) आणि ८ (१)

.................. यांच्याकडून (अर्जदाराचे नांव आणि पत्ता) अनुवंशशास्त्रीय समुपदेशन केंद्र / अनुवंशशास्त्रीय प्रयोगशाळा/ अनुवंशशास्त्रीय चिकित्सालय / स्वनातीत चिकित्सालय / प्रतिमा केंद्र यांची नोंदणी प्रदान करण्यासाठी / नुतनीकरण करण्यासाठी नमुना अ मध्ये दोन प्रती ........... रोजी प्राधिकाऱ्यांना अर्ज प्राप्त झाला.

नमुना अ मध्ये सादर केलेल्या अर्जासोबतची सहपत्राची यादी आणि सादर केलेली सहपत्रे यांची पडताळणी केली आणि बरोबर असल्याचे आढळून आले. पडताळणी केल्यानंतर असे आढळून आले की, सहपत्रांच्या यादीत नमुद केलेले आणि खालील दस्तऐवज प्रत्यक्षात जोडण्यात आले आहेत. ही पोच अर्जदाराला नोंदणी प्रदान करण्याचा किंवा तिचे नुतनीकरण करण्याचा हक्क प्रदान करीत नाही.

........................

समुचित प्राधिकाऱ्यांची किंवा प्राधिकाऱ्यांच्या
कार्यालयातील प्राधिकृत केलेल्या व्यक्तीची स्वाक्षरी आणि हुद्दा

परिशिष्ठ - २

## प्रतिज्ञापत्र

(PCPNDT कायदा अंतर्गत नियम ४(१) नुसार)

मी श्री / श्रीम/कु/डॉ ............ नाव ............ वडिल/पतीचे नाव .......... ..........., वय ....... वर्ष, (पत्ता) ....................... प्रतिज्ञापूर्वक जाहीर करतो की,

१) माझ्या मालकीच्या अनुवंश शास्त्रीय चिकित्सालय/प्रयोगशाळा/स्वनातित चिकित्सालय / अथवा यापैकी एकत्रित केंद्र येथे गर्भधारणा पूर्व व गर्भधारणा पश्चात गर्भलिंग निदान संबंधित कोणती तपासणी अथवा पध्दतीने लिंग निदान करणार नाही आणि अर्भकाचे लिंगनिदान कोणालाही घोषित करणार नाही. (कलम ४(२) of PCNDTA Act)

२) माझ्या मालकीच्या अनुवंश शास्त्रीय चिकित्सालय/प्रयोगशाळा/स्वनातित चिकित्सालयामध्ये आम्ही कोणत्याही गर्भलिंग निदान करण्याचे तंत्र, तपासणी व पध्दतीचा अवलंब करत नाही, असा फलक लावेन.

शपथेवर साक्ष देणारा

पडताळणी :

वरील माहिती मी पडताळली असून माझ्या ज्ञान व विश्वासाप्रमाणे ती बरोबर व खरी आहे. कोणतीही माहिती खोटी अथवा लपवलेली नाही.

पडताळणीचे ठिकाण .................. दिनांक ......................

शपथेवर साक्ष देणारा

203

परिशिष्ठ -३

नमुना ब

(पहा नियम ६ (२), ६ (५) आणि ८ (२)

नोंदणी प्रमाणपत्र

(दोन प्रतीत निर्गमित करावयाचे )

१. प्रसवपूर्व निदान तंत्रे आणि गैरवापरावरील प्रतिबंध) अधिनियम १९९४ (सन १९९४ चा अधिनियम क्रमांक ५७) कलम १९ (१) अन्वये प्रदान करण्यात आलेल्या शक्तीचा वापर करुन समुचित प्राधिकारी याव्दारे ......................... तारखेला समाप्त होणाऱ्या पाच वर्षाच्या कालावधीसाठी सदर अधिनियमाखाली अनुवंशशास्त्रीय सल्ला/ प्रसवपूर्व निदान प्रक्रिया/ प्रसवपूर्व निदान चाचण्या/ सोनोग्राफी प्रक्रिया करण्यासाठी खाली नमुद केलेल्या अनुवंशशास्त्रीय समुपदेशन केंद्राला / अनुवंशशास्त्रीय प्रयोगशाळेला/ अनुवंशशास्त्रीय चिकित्सालयाला / सोनोग्राफी चिकित्सालयाला / प्रतिमा केंद्राला नोंदणी प्रदान करीत आहे.

२. सदर नोंदणी अधिनियमाच्या आणि त्याखालील नियमांच्या अधिन असेल आणि त्याचे उल्लंघन झाल्यास हे नोंदणी प्रमाणपत्र सदर पाच वर्षाचा कालावधी समाप्त होण्यापूर्वी रदद होईल, त्याचप्रमाणे संबंधीतावर दंडात्मक कारवाई केली जाईल.

अ. अनुवंशशास्त्रीय समुपदेशन केंद्र / अनुवंशशास्त्रीय प्रयोगशाळा/ अनुवंशशास्त्रीय चिकित्सालय / सोनोग्राफी चिकित्सालय / प्रतिमा केंद्र याचे नाव आणि पत्ता

ब. (अनुवंशशास्त्रीय चिकित्सालयासाठी )

मंजुर जन्मपुर्व निदान प्रक्रिया.

नॉन इनव्हेंजिव्ह

(i) अल्ट्रासाऊंड

इनव्हेंजिव्ह

(ii) गर्भजलपरीक्षा

(iii) कोरीयॉनिक व्हीलाय बायोप्सी परिक्षा

(iv) फीटोस्कोपी

(v) गर्भ त्वचा किंवा अवयव बायॉप्सी

(vi) कोरडोसेंटेसीस

(vii) इतर कोणतीही (सविस्तर स्पष्ट लिहा)

क. (अनुवंशशास्त्रीय प्रयोगशाळेसाठी)

(i) गुणसूत्रीय अभ्यास

(ii) जैवरासायनिक अभ्यास

(iii) रेणु अभ्यास

ड. इतर कोणतेही उध्दिष्ट (स्पष्ट लिहा)

३. वापरण्यात येणाऱ्या उपकरणाचे / साधनाचे मॉडेल आणि उत्पादक (यामध्ये काही बदल झाल्यास तो नियम १३ खाली योग्य प्राधिकाऱ्यांना कळवणे आवश्यक आहे.)

४. दिलेली नोंदणी क्रमांक

५. पुर्वीच्या नोंदणी प्रमाणपत्राच्या वैधतेचा कालावधी (केवळ नुतनीकरण झालेल्या नोंदणी प्रमाणपत्रासाठी)

......................पासून ......................पर्यंत

समुचित प्राधिकाऱ्यांची स्वाक्षरी

नांव आणि हुददा

शिक्का

दिनांक

## परिशिष्ठ - ४

## नमुना एच

(पहा नियम ९ (५) )

प्रसुतिपुर्व निदान तंत्रे (नियम आणि गैरवापरावरील प्रतिबंध)
अधिनियम, १९९४ खाली नोंदणी प्रदान करण्याचे अर्ज
मंजूर /नामंजूर अर्ज यांचे स्थायी अभिलेख ठेवण्याचा नमुना

१. अनुक्रमांक
२. समुचित प्राधिकाऱ्यांचा फाईल क्रमांक
३. नोंद प्रदान करण्यासाठी अर्ज प्राप्त झाल्याची तारीख
४. अर्जदाराचे नाव, पत्ता, दुरध्वनी / फॅक्स इत्यादी
५. अनुवंशशास्त्रीय सल्लागार केंद्र / अनुवंशशास्त्रीय प्रयोगशाळा / अनुवंशशास्त्रीय चिकित्सालय / सोनाग्राफी चिकित्सालय / प्रतिमा केंद्र यांचे नाव आणि पत्ता (पत्ते)
६. सल्लागार समितीच्या सभेची तारीख आणि सल्लागार समितीच्या शिफारसीचा गोषवारा
७. अर्जाची निष्पती (प्रदान केली/ नामंजुर केली असे नमुद करा आणि आदेश पारित करण्याची दिनांक आदेश दिल्याची तारीख............. नमुना ब किंवा नमुना क
८. दिलेला नोंदणी क्रमांक आणि नोंद समाप्त होण्याची तारीख
९. नुतनीकरण (नुतनीकरण तारीख आणि कोणत्या तारखेपर्यंत वैध आहे हे नमुद करा)
१०. नुतनीकरण फाईल क्रमांक
११. जादा माहिती, (आवश्यक असल्यास)

.......................
समुचित प्राधिकाऱ्यांचे नाव,
हुददा आणि स्वाक्षरी

---

योग्य प्राधिकाऱ्यांसाठी मार्गदर्शक सुचना

(अ) नमुना एच नोंदवही म्हणुन स्थायी अभिलेखाच्या स्वरुपात ठेवावयाचे आहे आणि ते योग्य प्राधिकाऱ्यांच्या ताब्यात असेल
(ब) याचा अर्थ जे लागू नाही त्यावर काट मारा
(क) नुतनीकरणानंतर अनुवंशशास्त्रीय समुपदेशन केंद्र / अनुवंशशास्त्रीय प्रयोगशाळा / अनुवंशशास्त्रीय चिकित्सालय / स्वनातीत चिकित्सालय / प्रतिमा केंद्र याचा क्रमांक

बदलणार नाही. जर मालकी किंवा व्यवस्थापनात बदल झाला तर नवीन नोंदणी क्रमांक दिला जाईल.

(ड) नोंदणी क्रमांक दोन वेळा देण्यात येणार नाही.

(ई) प्रत्येक अनुवंशशास्त्रीय समुपदेशन केंद्राला / अनुवंशशास्त्रीय प्रयोगशाळेला / अनुवंशशास्त्रीय चिकित्सालयाला / स्वनातीत चिकित्सालयाला / प्रतिमा केंद्राला नमुना एच नोंदवण्यासाठी नोंदवहीची दोन पाने (फोलीओ) दिली जाऊ शकतात.

(फ) नुतनीकरण, मालकीचा बदल / व्यवस्थापनाचा बदल, कोणत्याही कायदेशीर कार्यवाहीची निष्पत्ती, नुतनीकरणासाठीच्या अर्जाचे निलंबन, रदद करणे, फेटाळणे यांची नोंद करण्यासाठी जादा माहिती या शिर्षकाखाली सोडण्यात आलेली जागा वापरली जाऊ शकते.

(ग) प्रत्येक फोलीओ (म्हणजेच नोंद वहीची दोन पाने) योग्य प्राधिकाऱ्याच्या स्वाक्षरीने (तारखेसहीत) अधिप्रमाणित करणे आवश्यक आहे आणि त्या नंतरची प्रत्येक नोंद देखील अशाच पध्दतीने अधिप्रमाणित करणे आवश्यक आहे.

टिप :- जीएसआर १ (इ) दि. १/१/१९९६ आणि दुरुस्ती नोटीस क्र जीएसआर११९ (इ) दि. २४/२/२०१४ नुसार भारतीय गॅझेट मध्ये मुख्य सुचना प्रसिध्द करण्यात आली आहे.

२५७

परिशिष्ठ- ५

नमुना क

(पहा नियम ६ (३) ६ (९) आणि ८ (३) )

नोंदणी प्रदान / नुतनीकरण अर्ज फेटाळण्यासाठी नमुना

प्रसवपूर्व निदान तंत्रे (नियम आणि गैरवापरावरील प्रतिबंध) अधिनियम १९९४ कलम १९ (२) अन्वये प्रदान करण्यात आलेल्या शक्तीचा वापर करुन समुचित प्राधिकारी ………… ………… याव्दारा अनुवंशशास्त्रीय समुपदेशन केंद्राचा / अनुवंशशास्त्रीय प्रयोगशाळेचा / अनुवंशशास्त्रीय चिकित्सालयाचा / स्वनातीत चिकित्सालयाचा / प्रतिमा केंद्राचा नोंदणी प्रदान करण्याचा / नुतनीकरण करण्याचा अर्ज फेटाळून लावीत आहेत.

(१) अनुवंशशास्त्रीय समुपदेशन केंद्र / अनुवंशशास्त्रीय प्रयोगशाळा / अनुवंशशास्त्रीय / स्वनातीत चिकित्सालय यांचे नाव आणि पत्ता

(२) नोंदणी प्रदान करण्याचा / नुतनीकरण करण्याचा अर्ज फेटाळून लावण्याची कारणे

…………………………
योग्य प्राधिकाऱ्यांची स्वाक्षरी
नाव आणि हुददा
शिक्का

दिनांक

जे लागू नाही किंवा आवश्यक नाही त्यावर काट मारा.

गर्भधारणामुळे आणि प्रसवपूर्व निदान तंत्रे (लिंग निवड प्रतिबंध) कायदा १९९८ (१९९४ मधील ५७ कलम ) असे वाचावे.

## परिशिष्ठ - ६

### पीसीपीएनडीटी कायदा १९९४ नुसार सोनोग्राफी केंद्राची तपासणी करिता तपासणी सुचीचा नमुना

अ. सामान्य सुचना.

| | | |
|---|---|---|
| तपासणी वेळ व दिनांक | दिनांक : | वेळ : |
| तपासणी अधिकारी यांचे नाव व हुद्दा अथवा सहसदस्यांची विस्तृत माहिती, गरज असल्यास | | |
| नाव :<br>हुद्दा : | | |
| नाव :<br>हुद्दा : | | |
| नाव :<br>हुद्दा : | | |
| केंद्राचे नाव | | |
| केंद्र मालकाचे नाव | | |
| केंद्राचा प्रकार (अनुवंशशास्त्रीय चिकित्सालय, अनुवंशशास्त्रीय समुपदेशन केंद्र, प्रयोगशाळा, सोनोग्राफी केंद्र, इमेजींग केंद्र) | | |
| एकत्रित असल्यास नोंद करावी. | | |
| सोनोग्राफी केंद्राचा पुर्ण पत्ता | | |
| दुरध्वनी क्रमांक | | |
| ई-मेल | | |

| अ. क्र. | पहाणी / तपासणी करण्याच्या बाबी | निरिक्षण |
|---|---|---|
| अ (१) | नोंदणीकृत केंद्र आहे काय<br>जर होय : नोंदणी दिनांक (तारीख / महिना / वर्ष) | होय किंवा नाही |
| | १.१ नोंदणी प्रमाणपत्र / क्रमांक व वैधता तारीख | |
| | १.२ मुदत बाहय नोंदणी प्रमाणपत्र असल्यास नुतणीकरणासाठी अर्ज वेळेत आहे का | होय किंवा नाही. |
| | १.३ केलेले नसल्यास, केंद्र किती कालावधीपासून नोंदणीकृत आहे. (नुतणीकरण न करणे / नोंदणी नसणे) आणि या कालावधीत किती सोनोग्राफी तपासण्या करण्यात आल्या (अभिलेखे पडताळून पाहणे) | |
| ब (१) | केंद्रात कोणत्या प्रकारचे लिंग निदान उपकरणे आहेत ? प्रत्येक उपकरणांची यादी (उदा. - सोनोग्राफी यंत्र, सहज हालवता येणारे सोनोग्राफी यंत्र) मेक व मॉडेल क्रमांक इ. सहित जोडावे. | सहज हालवता येणाऱ्या यंत्राची, प्रोबची नोंदणी नोंदणीकृत असल्यास तपासणी करावी. मशीन वापर नोंदणीकृत क्षेत्रातच होत आहे याची खात्री |

| | | |
|---|---|---|
| | | करावी. |
| | १.१ केंद्रातील व नोंदणी प्रमाणपत्रातील उपकरण / उपकरणे सारखीच आहेत काय | होय / नाही. (नोंदणी प्रमाणपत्रात नसलेल्या उपकरणाविषयी सविस्तर माहिती नमुद करावी. |
| | १.२ समुचित प्राधिकाऱ्यास या उपकरणाची नोंद नोंदणी प्रमाणपत्रात अदयापी घेतली नाही असे कळविण्यात आले आहे काय ? | होय / नाही. |
| | १.३ केंद्रचालकाचे नोंदणी नंतर काही उपकरणे विकली आहेत काय | होय / नाही. |
| | १.४ जर होय असेल तर समुचित प्राधिकारी यांना कळविले आहे काय | होय / नाही. |
| | १.५ संबंधित नाही | होय / नाही. |
| | १.६ मालकाने उपकरणे कोणास विकली याची माहिती ( केंद्राचे नाव / व्यक्ती / पुर्ण पत्ता / विकल्याची तारीख / दुरध्वनी क्र. नमुद करावा. | |
| | १.७ ज्या केंद्रास उपकरणे विकली ते केंद्र पीसीपीएनडीटी कायदयान्वये नोंदणीकृत आहे काय ? | होय / नाही. (नोंदणी प्रमाणपत्राचे कागदपत्रे, विक्री पुरावा) |
| | १.८ जिल्हा समुचित प्राधिकारी यांनी केंद्रातील उपकरण सील केले आहे काय? | होय / नाही. |
| | १.९ असल्यास, उपकरणाचा दुरुपयोग होत नाही व ती सील स्थितीत असल्याची खात्री करा. सर्व बाबींची नोंद करा. | |
| | १.१० काही उपकरणे स्वइच्छेने सुरु / उघड केले आहेत काय? | असल्यास तपासणी करुन नोंद करावी. |
| ब (२) | केंद्राची नोंदणी मोबाईल मेडीकल युनिट म्हणुन करण्यात आली आहे काय ? | |
| | २.१ उपकरण ठेवलेले वाहन जिल्हा समुचित प्राधिकाऱ्याकडे नोंदणीकृत आहे काय? | होय / नाही. |
| | २.२ | होय / नाही. कागदपत्रांची पडताळणी करा. |
| | २.३ नोंदणीसाठी केलेल्या आवेदनपत्रानूसार एमएमयु विषयक कर्मचाऱ्याकडून कार्यक्षेत्राची नेमुण दिलेल्या हालचालींची माहिती घ्या.मोबाईल मेडीकल युनीटच्या कार्यक्षेत्रांची नोंद करा. | |
| | २.४ मोबाईल मेडीकल युनीटमध्ये आरोग्य व वैदयकीय सेवा काय पुरविल्या जातात सविस्तर नोंद घ्या. | |
| क (१) | नोंदणीकृत केंद्र कोण वापरते? | |
| | नाव व शैक्षणिक अर्हता | |
| | १.१ नियम १८ (१) नुसार तेच नाव वापर कर्त्याच्या / डॉक्टरांच्या कपडयावर / ॲपरनवर आहे. | नसल्यास कारणे शोधा व नियम भंग झाल्याची नोंद घ्या. |

| | | |
|---|---|---|
| | १.२ जिल्हा समुचित प्राधिकाऱ्याने अधिकार पत्र दिलेली व्यक्तीच ~~[illegible] ( पीसीपीएनडीटी~~ कायदयानुसार) | होय / नाही. |
| | १.३ नोंदणी प्रमाणपत्र व शैक्षणिक अर्हता मान्यता प्राप्त व मेडीकल कॉन्सील ऑफ इंडिया / राज्यस्तरीय नियमानुसार आहे काय याची पडताळणी करा. | होय / नाही. |
| | १.४ वाहनातील उपकरण वापरकर्ता दुसऱ्या केंद्रात देखील निदान तंत्रे कायदयानुसार मान्यता प्राप्त आहे का१ असल्यास केंद्राचे नाव / भेटीची वेळ / इतर केंद्रातील नमुद करा. | |
| क (२) | अनुवंशीय प्रयोगशाळेच्या तपासणीमध्ये वरील प्रश्नावलील नियमानुसार बदल करावा. अनुवंशीय प्रयोगशाळा तपासताना लिंग निदान होण्याची शक्यता असलेल्या अनुवंशीय तपासण्यावर उपकरणापेक्षा जास्त भर दयावा. *<br>तपासणीत अंतर्भूत :-<br>● नोंदणी विषयक बाबीचे पुनर्वीलोकन<br>● उपकरणे, सेवा यांचे पुनर्वीलोकन<br>● तपासणी अहवाल व स्लाईडचे इतर पुनर्वीलोकन<br>● प्रयोगशाळा तंत्रज्ञ / डॉक्टर अनुवंशीय चाचण्या मान्यता प्राप्त असल्याची खात्री करा.<br>● प्रयोगशाळा तंत्रज्ञ / डॉक्टरांची अर्हता<br>● प्रतिज्ञापत्राचे पुनर्वीलोकन | |
| ड (१) | हे केंद्र गर्भपात सुविधा सुध्दा देते का१ | |
| | १.१ जर देत असल्यास हे केंद्र गर्भपात कायदयांतर्गत नोंदणीकृत आहे काय १ | होय / नाही. |
| | १.२ असल्यास नोंदणी प्रमाणत्र तपासावे. (आणि गर्भपात केंद्राच्या तपासणी फॉर्म नुसार तपासणी करावी.) | |
| इ (१) | प्रमुख ठिकाणी पीसीपीएनडीटी नोंदणी प्रमाणपत्र लावले आहे काय१ | होय / नाही. |
| | १.१ प्रमुख ठिकाणी दर्शनी भागात सुचना फलक लावला आहे का१ नियमानुसार गर्भलिंग निदान करणे प्रतिबंधित आहे.<br>ठळक आक्षरात (मराठी / इंग्लिश) | होय / नाही. |
| | १.२ किमान पीसीपीएनडीटी कायदयाच्या पुस्तकाची एक प्रत केंद्रात उपलब्ध आहे | होय / नाही. |

फ. अहवाल व अभिलेख्याचे पुनर्वालोकन

१. मागील तीन महिन्याचे दर महिन्याच्या पाच तारखेला मासिक अहवाल व फॉर्म (डी.ई, एफ, जी) च्या सत्यप्रती सादर करुन त्याची पोच पावती घेतली आहे काय : होय / नाही. (फॉर्म एफ ची पडताळणी करा)

२. नियम ९ (१) नुसार केंद्रात अभिलेखे जतन केले जाता काय :- होय किंवा नाही.

नसल्यास तपशील दया............................................................................................

३. केंद्रात मागील तीन महिन्याची एफ फॉर्मची संख्या किती आहे ................................

३.१) नमुना दाखल काही एफ फॉर्म व ओपीडी रजिस्टरची पडताळणी करा.

३.२ मासिक अहवालात मागील तीन महिन्यात किती निदान तपासण्या नमुद केल्या...............

४. त्रुटी असल्यास नोंद करा..........................................................................................

.......................................................................................................................

५. एफ फॉर्म तपासल्याची संख्या ..............................................

५.१ एक मुलगी असलेल्या किती गरोदर माता

| अ. क्र. | माहिती | क्रमवारीनुसार सापडलेले अपुर्ण एफ फॉर्म | क्रमवारी नुसारी सापडलेले कोरे एफ फॉर्म | क्रमवारी नुसारी पुर्ण भरलेले एफ फॉर्म | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| १. | रुग्णाचे नाव, वय | | | | |
| २. | रुग्णास असलेल्या यापुर्वी असलेल्या मुलांची संख्या (लिंगारुहित) | | | | |
| ३ | पतीचे / वडीलांचे नाव | | | | |
| ४. | पुर्ण पोस्टाचा पत्ता | | | | |
| ५ | संदर्भित करणाऱ्या डॉक्टरांचे पुर्ण नाव व पत्ता व अहर्ता | | | | |
| ६ | स्त्रीरोग तज्ञ सोनोग्राफी केंद्र चालक असल्यास सेल्फ रेफरल (संदर्भ पत्र आवश्यक) | | | | |
| ७ | शेवटच्या पाळीचा दिनांक व किती आठवड्यांची गर्भवती | | | | |
| ८ | कोणत्या तारखेस सोनोग्राफी यंत्रानी | | | | |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | तपासणी केली. योग्य नोंद घ्यावी. | | | | |
| ९ | [illegible] पत्रावर गर्भवती महिलेची सही | | | | |
| १० | सोनोग्राफी तपासणी करणाऱ्या डॉक्टरांचे सही सहित योग्य रितीने भरलेले प्रतिज्ञापत्र | | | | |
| ११ | केंद्रचालक / रेडिओलॉजिस्ट अथवा स्त्रीरोगतज्ञ यांचे नाव, सही व नोंदणी क्रमांक नमुद केले आहे. | | | | |

तपासणी अधिकाऱ्याचे स्वाक्षरी / नाव /पदनाम

नोंदणीकृत केंद्राच्या मालकाची अथवा ज्यांच्या नावे नोंदणी आहे त्यांची सही.

दिनांक ....................

स्थळ - ....................

263

# परिशिष्ठ - ७

## नमुना फ

(पहा कलम ४ (३) चा उपबंध,
नियम ९(४) आणि नियम १० (१-अ))
अनुवंशशास्त्रीय चिकित्सालयाने /स्वनातीत चिकित्सालयाने/प्रतिमा केंद्राने
गर्भवती महिलेशी संबधीत ठेवावयाच्या अभिलेखाचा नमुना

भाग अः- सर्व निदान कार्यप्रणाल /चाचण्या यासाठी भरावयाचे

१. अनुवंशशास्त्रीय चिकित्सालय / स्वनातीत चिकित्सालय /प्रतिमा केंद्र यांचे नाव आणि पत्ता
२. पीसीपीएनडीटी नोंदणी क्रमांक
३. रुग्णाचे नाव वय..................
४. हयात मुलांची एकुण संख्या
अ) हयात मुलांची संख्या व त्यांची वये (वर्षे किंवा महिने)
ब) हयात मुलींची संख्या व त्यांची वये (वर्षे किंवा महिने)
५. पतीचे/पित्याचे नाव
६. संपुर्ण पत्ता,दुरध्वनी क्रमांक, (उपलब्ध असल्यास)
७. (अ) कुणी पाठवले (डॉक्टर / अनुवंशशास्त्रीय सल्लागार केंद्र यांचे संपुर्ण नाव आणि पत्ता)
(रुग्णासमवेत पाठवलेली चिठ्ठी / टिप्पणी केस पेपर समवेत काळजीपुर्वक जपून ठेवा) रुग्ण स्वतःहून आला काय )
(ब) स्त्रीरोग तज्ञ /क्षकिरण शास्त्रज्ञ / नोंदणीकृत वैद्यकिय व्यावसायिक यांनी स्वतः संदर्भीत केल्यास ..............................

(संदर्भ चिठ्ठी चाचणी करणाऱ्या कारणासह आणि केसपेपर फॉर्म फ सोबत काळजीपुर्वक जतन करावी)

गर्भवती स्त्रीने स्वतः चाचणीची मागणी करणे किंवा नातेवाईकांनी चाचणीची विनंती करणे यांचा अंतर्भाव स्वतः संदर्भीत करणे यामध्ये होत नाही)

८. शेवटच्या मासिक पाळीचा कालावधी/गर्भारपणाचे आठवडे

भाग ब- अआक्रमिक निदान कार्यप्रणाली/चाचणी यासाठी भरावयाचे

(९) प्रक्रिया करणाऱ्या वैद्यकीय व्यावसायिकाचे नाव ..................................

(१०) प्रक्रिया करण्याची कारणे (संदर्भ चिठ्ठीत नमूद केलेल्या कारणानुसार)( आवश्यकतेनुसार ✓ खुण करावी)

(१) गर्भाशय आणि / किंवा अस्थानी गर्भारपणाचे निदान करण्यासाठी आणि जीवन क्षमतेसंबंधी खात्री करणे
(२) गर्भारपणाचा कालावधीनिश्चित करणे (तारिख)
(३)गर्भाची संख्या आणि त्यांची जरायुता याचे शोधन

